**सन २०१८-१९ या आर्थिक वर्षात आशा प्रशिक्षण पुस्तिका/ साहित्याची छपाई करण्यास प्रशासकीय मंजूरी देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः प्रशामा-०६१८/प्र.क्र.३३८/आरोग्य -७**
१० वा मजला, गोकुळदास तेजपाल रूग्णालय संकूल इमारत,
नवीन मंत्रालय, मुंबई - ४०० ००१.
दिनांक : ०४ जुलै, २०१८.

<u>वाचा</u> :- अतिरिक्त अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई याचे पत्र क्र.राआअ/आशा/ प्रशासकीय मान्यता/छपाई १६३०७/१८, दिनांक २१ मे, २०१८.

**<u>प्रस्तावना :-</u>**

राष्ट्रीय आरोग्य अभियानांतर्गत आशा स्वयंसेविका योजनेअंतर्गत सन २०१८-१९ या वर्षामधील पीआयपी मध्ये FMR Code B.१.१.१.३.१ या लेखाशिर्षाखाली रु.३७३.०५ लक्ष इतका निधी केंद्र शासनास प्रस्तावित करण्यात आलेला आहे. सदर योजनेअंतर्गत आशा प्रशिक्षण पुस्तिका/ साहित्यांची छपाई करावयाची आहे. सदर निधीमधून आशा प्रशिक्षण पुस्तिका/ साहित्यांची छपाई करण्यासाठी रु.५६.३८ लक्ष निधी खर्च करण्यास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय :-</u>**

राष्ट्रीय आरोग्य अभियानांतर्गत आशा स्वयंसेविका योजनेअंतर्गत सन २०१८-१९ या वर्षाकरीता पीआयपी मध्ये FMR Code B.१.१.१.३.१ या लेखाशिर्षाखाली प्रस्ताविक करण्यात आलेल्या निधीतून खालील विवरणपत्रामध्ये नमूद केलेले साहित्य/ पुस्तकांची छपाई करण्यास आवश्यक असणारा रु.५६.३८ लक्ष (रुपये छप्पन लक्ष अडतीस हजार फक्त) इतका निधी खर्च करण्यास खालील अटींच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

विवरणपत्र

| FMR Code | Budget Head | Unit of measures | No of Module | Proposed Budget (Rs. Lakhs) |
|---|---|---|---|---|
| B.1.1.1.3.1 | Performance Monitoring Module | Block Facilitator, Trainer & BCM | 510 | 0.69 |
| | Induction Module | ASHA + Trainer | 2000 | 2.85 |
| | Module VI | ASHA | 2000 | 2.55 |
| | Module VII | | 2000 | 2.55 |
| | Module VI & VII Phase III (TOT module) | Trainer | 150 | 0.07 |
| | Phase IV (HBNC ASHA module) | ASHA | 2000 | 1.08 |
| | NCD Module | ASHA | 20417 | 18.99 |
| | Orientation of Oral Health | ASHA | 10000 | 5.55 |
| | Pallative care module for ASHA | ASHA | 13543 | 4.06 |
| | Printing of ASHA Enumeration Registers | ASHA | 12000 | 18.00 |
| **Total** | | | **64620** | **56.38446** |

१) छपाई करावयाच्या प्रशिक्षण पुस्तिका/ डायरी/ बुकलेट/ रजिस्टर या बाबींची आवश्यकता / मागणी यांची शहानिशा / खातरजमा करण्यात यावी.

२) प्रशिक्षण पुस्तिका/ डायरी/ बुकलेट/ रजिस्टर यांचे तांत्रिक विनिर्देश (Technical Specification) संबंधित तज्ञांकडून ते गरजेनुसार व अद्ययावत असल्याची खातरजमा करण्यात यावी. तसेच तांत्रिक विनिर्देश (Technical Specification) कोणत्याही विशिष्ट कंपनीला फायदा होईल अशारितीने तयार करण्यात आलेला नाही, ही बाब तपासून पहावी.

३) तक्ता क्र.३ मधील प्रशिक्षण पुस्तिका/ डायरी/ बुकलेट/ रजिस्टरची छपाई प्रशासकीय मान्यता व प्रकल्प अंमलबजावणी आराखडयातील मंजूरीच्या अधीन राहून शासनाच्या खरेदी धोरणानूसार राज्य आरोग्य सोसायटी, मुंबई यांनी पारस स्टेशनरी व झेरॉक्स यांचे सोबत झालेल्या करारानुसार (NHM/ Store/ Office Stationery/ ९६१०६/२०१७, dated on ३०/१२/२०१७) करण्यात येईल.

४) उपरोक्त तक्त्यामध्ये नमूद केलेल्या प्रशिक्षण पुस्तिका/ डायरी/ बुकलेट/ रजिस्टरची छपाई करताना करारात असलेल्या दरानूसार छपाई करण्यात येईल, याची कृपया दक्षता घ्यावी.

५) उपरोक्त तक्त्यामध्ये नमूद केलेल्या प्रशिक्षण पुस्तिका/ डायरी/ बुकलेट/ रजिस्टरची छपाई करताना अतिरिक्त निधीची आवश्यकता भासत असल्यास पुनर्विलोकनाद्वारे अतिरिक्त निधी प्राप्त करण्यात येईल.

२. उपरोक्त अनुक्रमांक १ ते ५ येथे नमूद अटींची पूर्तता करण्याची व सदर छपाई नियमानुसार व आवश्यकते प्रमाणे आहे हे सुनिश्चित करण्याची संपूर्ण जबाबदारी आयुक्त, आरोग्य सेवा व अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, संचालक, आरोग्य सेवा संचालनालय व कार्यक्रम प्रमुख यांची राहील.

३. शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, भाग-२, दिनांक १७ एप्रिल, २०१५ सोबतच्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग-पहिला, उपविभाग दोन मधील, नियम पुस्तिका १९७८, भाग-पहिला, उपविभाग दोन मधील अ.क्र.२०-ब नियम क्र. ७३ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार सदरहू प्रस्तावास मान्यता देण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०७०४११३३०६७११७ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Amol Nilakanth Sakharkar

Digitally signed by Amol Nilakanth Sakharkar
DN: CN = Amol Nilakanth Sakharkar, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Agriculture Animal Husbandry dairy and Fisheries Department
Date: 2018.07.05 14:40:16 +05'30'

(अ. नि. साखरकर)
अवर सचिव

प्रति,

आयुक्त (आरोग्य सेवा) तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.

प्रत:-

१) प्रधान सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.

२ )संचालक (आरोग्य सेवा), आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.

३) अतिरिक्त संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.

४) सर्व सह संचालक (आरोग्य सेवा संचालनालया मार्फत)

५) निवडनस्ती (आरोग्य-७ कार्यासन)